**अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२०/प्र.क्र.१३८/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ एप्रिल, २०२०

**वाचा :-** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/ अर्थ-३, दि.१६/४/२०२०.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या अधिनस्त एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येते. केंद्र शासनाकडून विहीत कालावधीत निधी प्राप्त होत नसल्यामुळे अंगणवाडी सेविकांचे मानधन आदा करणे शक्य व्हावे, याकरिता अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २ जून, २०१७ रोजी आयोजित बैठकीत अंगणवाडी सेविकांच्या मानधनाची अर्थसंकल्पित केलेली रक्कम अपेक्षित केंद्रीय सहाय्य अप्राप्त असले तरी खर्च करण्यास विभागास अनुमती देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. वित्त विभागाने दिनांक १६ एप्रिल २०२० च्या परिपत्रकानुसार सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या अर्थसंकल्पीय तरतुदी पहिल्या तीन महिन्यांकरिता (जून २०२० अखेर) एकूण वार्षिक तरतुदीच्या १५ ते २५ टक्केच्या मर्यादेत खर्च करण्यास मान्यता दिली आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये अंगणवाडी सेविका, मदतनिस व मिनी अंगणवाडी सेविका यांचे मार्च, २०२० मधील मानधन अदा करण्यास मान्यता देण्यात येत असून, सदर प्रयोजनासाठी लेखाशिर्षनिहाय अर्थसंकल्पीय तरतूद व प्रस्तावित वितरण खालीलप्रमाणे :-

(रुपये लाखात)

| अ.क्र. | प्रधान/ लेखाशिर्ष / संगणक संकेतांक/ उद्दिष्ट | अर्थसंकल्पीय अंदाज २०२०-२१ | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | २२३६, पोषण आहार<br>१०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम,<br>(०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प,<br>(०८) (०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च) केंद्र हिस्सा ६०% (२२३६-१९०९),<br>०२ मजुरी | २७७५०.०० | ४२२०.९७ |
| २ | (०८) (०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च) राज्य हिस्सा ४०% (२२३६-१९१८),<br>०२ मजुरी | १८५००.०० | २८१३.९८ |
| ३ | (०८) (०५) अंगणवाडी सेवा<br>(अतिरिक्त राज्य हिस्सा १००%)<br>(२२३६-१९४५)<br>०२ मजुरी | ३७०००.०० | ६२८८.२९ |
| | **एकूण** | **८३२५०.००** | **१३३२३.२४** |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १६.०४.२०२० रोजीच्या परिपत्रकामधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००४२४१३०५१३७३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.04.24 13:11:35 +05'30'

**(ला. रा. गुजर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
६) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
९) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास ) (जिल्हा परिषद)
१०) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
११) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१२) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई.
१३) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना कळविण्यात येते की, त्यांनी BDS प्रणालीवर निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करावा.
१४) निवड नस्ती -का-६.